जलस्वराज्य-२ कार्यक्रम.
वर्ष २०१९-२० करिता जलस्वराज्य-२ कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांच्या नावे असलेल्या स्विय प्रपंजी खात्यामध्ये निधी वर्ग करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-०६१९/प्र.क्र.१०१/पापु-११**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
तारीख: -२६ मार्च,२०२०

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३/प्र.क्र.२००/पापु-११, दि.०४/०१/२०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र -१२१४/प्र.क्र.२५६/पापु-११,दि.०३/०३/२०१६**
३) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१/०४/२०१९**
४) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९**
५) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३/०३/२०२०**

**प्रस्तावना :**

सन २०१४ ते २०२० या कालावधीकरिता राज्यामध्ये लोक सहभागातून आणि मागणी आधारित तत्वावर जलस्वराज्य-२ कार्यक्रम राबविण्याबाबतचा निर्णय दिनांक ०४/०१/२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी जागतिक बँकेकडून अर्थसहाय्यीत प्राप्त होणार असून प्राप्त होणारे अर्थसहाय्य प्रोग्राम फॉर रिझल्टस या वित्तीय साधनांतर्गत उपलब्ध होणार आहे. या कार्यक्रमांची किंमत २३५ दशलक्ष डॉलर असून त्यापैकी ७० टक्के कर्ज (१६५ दशलक्ष डॉलर) व ३० टक्के (७० दशलक्ष डॉलर) राज्यशासनाचा सहभाग राहणार आहे. या साधनांतर्गत मिळणारे अर्थसहाय्य उद्दिष्टपूर्ती आधारित निधी संवितरण निर्देशकांशी (Disbursement Linked Indicators - DLIs) निगडीत आहे. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत हाती घेण्यात आलेल्या तसेच हाती घेण्यात येणाऱ्या विविध घटकांवर खर्च करुन प्रकल्प विहीत कालावधीत पूर्ण करण्याकरिता उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांचे नावे रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, मुंबई येथे स्विय प्रपंजी खाते (PLA) क्र. ६१८४३५००१० उघडण्यात आलेले आहे.

वर्ष २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी मागणी क्र. वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प, (०६) (१६) प्रकल्प नियोजन व संनियंत्रण कक्ष (जलस्वराज्य योजना) (२२१५ ९३०७), ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली रुपये १८०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे ऐंशी कोटी फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यापैकी रू.१०८.०० कोटी इतकी मंजूर तरतूद नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने याआधी आहरीत करण्यात आला असून सदर निधीचे सनियंत्रण संस्थांना वाटप करण्यात आले आहे. रू.१८०.०० कोटी मूळ तरतुदीपैकी उर्वरित रू. ७२.०० कोटी निधी मंजूर करून आहरीत करण्यास मान्यता देणे बाबतचा प्रस्ताव वित्त व नियोजन विभागास सादर करण्यात आला. वर्ष २०१९-२० करीता रू.१२६.०० कोटी इतकी सुधारीत अंदाज मंजूर करण्यात आले असून रू.१८.०० कोटी इतकी तरतूद भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथील उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, (Dy.Secretary and Director, RSPMU) यांचे नावे असलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/C.) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करुन संबंधित यंत्रणांना वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी मागणी क्र. वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प, (०६) (१६) प्रकल्प नियोजन व संनियंत्रण कक्ष (जलस्वराज्य योजना) (२२१५ ९३०७), ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली वर्ष २०१९-२० साठी मंजूर असलेल्या अर्थसंकल्पित तरतुदीमधून रु.१८.०० कोटी (अक्षरी रुपये अठरा कोटी फक्त) इतका निधी जलस्वराज्य-२ कार्यक्रमाच्या बाबींवर खर्च करण्याकरिता उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांचे नावे भारतीय रिझर्व्ह बँक (Dy. Secretary and Director, RSPMU) येथे असलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) या तरतूदीतून जागतिक बँकेशी केलेल्या करारात नमूद करण्यात आलेल्या तरतूदीनुसार जलस्वराज्य-२ कार्यक्रमाच्या बाबींवर खर्च करण्यात यावा.
२) सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.
३) सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमून्यात शासनाला सादर करावे. तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.

४) सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि त्याबाबत विहीत नमुन्यातील अहवाल विहीत दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सादर करावा.

२. सदर रक्कम रुपये १८.०० कोटी (अक्षरी रुपये अठरा कोटी फक्त) वितरणाकरिता शासन निर्णय क्र. जस्वप्र-१२१४/प्र.क्र.२५६/पापु-११, दि.०३ मार्च,२०१६ या अन्वये वित्त नियंत्रक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांचे नावे भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथील उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, (Dy. Secretary and Director, RSPMU) यांचे नावे असलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांनी सदर अनुदानाची रक्कम “Dy.Secretary and Director (R.S.P.M.U) P.L.A. A/C ६१८४३५००१०” यांचे नावे, धनादेशाद्वारे उपलब्ध करुन दयावी.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४७/१४४३, दिनांक २०.०२.२०२० आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७३/व्यय ३, दिनांक ०६.०३.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202003261052544728 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayant Vasant Wani

Digitally signed by Jayant Vasant Wani
Date: 2020.03.26 15:12:50 +05'30'

**जयंत वाणी**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, फ्री प्रेस जनरल मार्ग, मुंबई-२१.

३. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा-कुर्ला संकुल (पूर्व), मुंबई-५१.
४. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
५. वित्त विभाग (व्यय-३/को.षा.प्र.५/असं-१८)
६. नियोजन विभाग (कार्या-१४४३/१४१४)
७. अवर सचिव (पापु-०४), लेखाधिकारी (पापु-२०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.
८. वित्त नियंत्रक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४०० ६१४.
९. रोख शाखा, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४०० ६१४.
१०.निवड नस्ती, कार्यासन क्र.पापु-११, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४००६१४.